## उपसंहार.

'चंद्रावळीवर्णन' पूर्ण झाले, काव्यामृते विश्व समस्त धाले, ।
जे गाति हर्षे नर आणि नारी, ते सर्वभावे मिळती मुरारी. ॥ १

## कविवर्णन.

पिता मोरजोशी महा ख्यात आहे, तथा जानकी नाम मातेसि आहे, ।
अहो! थोरल्या दोन्हि बंधूसि साचे, असे नाम मल्हारिचे त्र्यंबकाचे. ॥ १
तया धाकुटा तोच नागेश पाहे, कवित्वी जया ज्ञान संपूर्ण आहे. ।
तयाच्या मुखे ग्रंथ संपूर्ण झाला, जना वाचिता फार आनंद झाला. ॥ २

कोकाव्या[1] यशवंतराव जगती विख्यात राजा असे
त्याच्या पुण्यकृती पुरोहित बरा तो मोरजोशी वसे ।
तत्पुत्रे लघुकोमलामलपदी पद्मावळी गुंफिली
श्रीनागेशकवीश्वरे सभवरे चंद्रावळी वर्णिली. ॥ ३

गणेशास आधी नमस्कार केला, तयानंतरे प्रार्थिले शारदेला, ।
करा जोडुनी वंदिले सद्गुरूसी, वरा ग्रंथविस्तार केला त्वरेसी. ॥ ४

१. हा कोणी जहागिरदार, इनामदार असावा ह्या यशवंतरावाविषयी माहिती अहमद-नगराकडील इतिहासप्रिय हितचिंतकानी मिळवून पाठविल्यास फार उपकार होतील.